आंतरराष्ट्रीय चित्रपट महोत्सावांचे आयोजन करणाऱ्या संस्थांना अर्थसहाय्य देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : आंचिम-२०२३/प्र.क्र.१२४/सां.का.१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय (विस्तार), मुंबई -४०० ०३२.
दिनांक : ११ मार्च, २०२४

**वाचा :**

१. शासन निर्णय, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग क्रमांक : आंचिम २००३/प्र.क्र.२२३/ सां.का.३, दिनांक २६.१०.२००४.
२. शासन निर्णय, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग क्रमांक : आंचिम-२००७/प्र.क्र.४६/ सां.का.३, दिनांक ०८.३.२००७.
३. शासन निर्णय, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग क्रमांक : आंचिम-२००९/प्र.क्र.४८/ सां.का.३, दिनांक ३०.७.२००९.
४. शासन निर्णय, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग क्रमांक : आंचिम-२०११/प्र.क्र.१५८/ सां.का.१, दिनांक १८.१०.२०१२.

**प्रस्तावना :**

जगभरातील माहितीपट आणि लघुपट निर्मात्यांना भेटण्यासाठी, विचारांची देवाणघेवाण करण्यासाठी व माहितीपट, लघुपट आणि ॲनिमेशन चित्रपटांच्या सह-निर्मिती आणि विपणनाच्या शक्यता शोधण्यासाठी एक व्यासपीठ उपलब्ध करून देण्याचा या महोत्सवाचा उद्देश आहे. महोत्सवात राष्ट्रीय आणि आंतरराष्ट्रीय स्पर्धा विभागात चित्रपट दाखवले जातात. तसेच, राष्ट्रीय आणि आंतरराष्ट्रीय स्पर्धा विभागातल्या चित्रपटांसाठी आलेल्या प्रवेशिकांममधून उत्तम चित्रपट निवडण्याचे काम राष्ट्रीय आणि आंतरराष्ट्रीय ज्यूरी सदस्यांमार्फत अत्यंत परिश्रमपूर्वक केले जाते. महोत्सव म्हणजे केवळ चित्रपट पाहणे नसते तर समविचारी रसिक, अभ्यासक, दिग्दर्शक यांच्याशी चर्चा करुन, त्यांना प्रश्न विचारुन चित्रपटांचे माध्यम समजून घेण्याचीही संधी असते. महोत्सवांचे कर्तेधर्ते जगभरच्या महोत्सवांमधून भटकत असतात, शेकडो चित्रपट पहात असतात आणि जिथे-जिथे ज्या चांगल्या गोष्टी पहायला मिळतात ते आपल्या देशांतील महोत्सवांमधून दाखवता यावेत यासाठी धडपडत असतात. या सगळ्या प्रवाह बदलांची सुरुवात महोत्सवांनी केली पाहिजे आणि महोत्सवाचे हे लोण राज्यभर जेवढे पसरेल तेवढा त्याचा अधिक उपयोग होईल. संस्कृती संवर्धनाचा एक महत्वाचा भाग म्हणून शासन नेहमी अशा महोत्सवांच्या पाठीशी उभे राहते. सद्यःस्थितीत खालील तीन संस्थांना त्यांच्यासमोर दर्शविल्याप्रमाणे अनुदान देण्यात येते :-

१) पुणे फिल्म फाऊंडेशन आयोजित पुणे आंतरराष्ट्रीय चित्रपट महोत्सव यांना ₹४.०० कोटी
२) दि आशियाई फिल्म फाऊंडेशन आयोजित आशियाई चित्रपट महोत्सव यांना ₹१०.०० लक्ष
३) मुंबई ॲकेडमी ऑफ मुव्हिंग इमेजेस आयोजित मामि आंतरराष्ट्रीय चित्रपट महोत्सव यांना ₹१०.०० लक्ष

त्याबरोबर "प्रथम येणाऱ्यास प्रथम" या तत्वावर विहीत निकषांची पूर्तता करणाऱ्या कमाल १० संस्थांना प्रत्येकी ₹५.०० लक्ष इतके अनुदान देण्यात येते. आतापर्यंत ज्या संस्थांनी शासनाच्या प्रचलित धोरणानुसार जनसामान्यांमध्ये शासनाची प्रतिमा उंचावली आहे आणि प्रगती केली आहे, अशा संस्थांपैकी मराठवाडा

आर्ट, कल्चर अँड फिल्म फाऊंडेशन आयोजित अजिंठा वेरूळ महोत्सव, छत्रपती संभाजीनगर या संस्थेचा समावेश होणे आवश्यक आहे.

तसेच, एनिमेला हा भारतातील पहिला आंतरराष्ट्रीय ॲनिमेशन, गेमिंग, VFX, कॉमिक्स आणि XR (AVGC-XR) महोत्सव आहे. ॲनिमेलासाठी मुंबई हे एक अप्रतिम यजमान शहर असून, जगातील सर्वात मोठ्या ॲनिमेशन फिल्म फेस्टिव्हल, फ्रान्सच्या भागीदारीत आणि केंद्र शासनाच्या माहिती आणि प्रसारण मंत्रालयाने मान्यता दिलेली आहे. सदर महोत्सव जगभरातील प्रसिद्ध कलाकार, चित्रपट निर्माते, कथाकार, गेम डेव्हलपर आणि व्यावसायिकांना आकर्षित करण्यासाठी सज्ज आहे. सदरचा महोत्सव ही नवीन संकल्पना म्हणून महाराष्ट्र राज्याने सुरू करावी यासाठी या क्षेत्रात काम करणाऱ्या Aniverse & Visual Arts Foundation एनिमेला आंतरराष्ट्रीय AVGC - XR महोत्सव या संस्थेचाही समावेश उक्त शिखर संस्थांमध्ये समावेश करणे आवश्यक आहे.

"आंतरराष्ट्रीय" या शब्दाला शोभेल अशी शिस्त आणि व्यवस्थापन असायला हवी. परंतु, असे महोत्सव दरवर्षी भरवायचे तर त्यासाठी भरीव पाठबळ हवे. राज्यातील महोत्सवांसाठी शासन काही निधी राखून ठेवते हे खरे आहे. परंतु, ती रक्कम अगदीच कमी असून, चित्रपट महोत्सवासाठी आवश्यक असलेल्या वस्तुंची/साहित्यांच्या दरांमध्ये लाक्षणिक वाढ झालेली असल्यामुळे आंतरराष्ट्रीय चित्रपट महोत्सव साजरा करणाऱ्या संस्थांच्या अनुदानामध्ये "प्रथम येणाऱ्यास प्रथम" या तत्वावर विहीत निकषांची पूर्तता करणाऱ्या कमाल १० संस्थांना देण्यात येणाऱ्या अनुदानामध्ये वाढ करण्याची आणि नियमित अनुदान देण्यात येणाऱ्या तीन संस्थांमध्ये आणखी दोन संस्थांची वाढ करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय

संदर्भीय शासन निर्णयान्वये यापूर्वी घेण्यात आलेले निर्णय या शासन निर्णयान्वये अधिक्रमित करण्यात येत आहे. आंतरराष्ट्रीय चित्रपट महोत्सव साजरा करणाऱ्या खालील संस्थांना त्यांच्यासमोरील रकान्यामध्ये उल्लेखिलेल्याप्रमाणे त्यांना देण्यात येणाऱ्या अनुदानामध्ये वाढ करण्यास "प्रथम येणाऱ्यास प्रथम" या तत्वावर विहीत निकषांची पूर्तता करणाऱ्या कमाल १० संस्थांना प्रत्येकी ₹१०.०० इतके अनुदान देण्यास या शासन निर्णयाद्वारे मान्यता देण्यात येत आहे :-

| अ. क्र. | संस्था/महोत्सवाचे नाव | सहाय्यक अनुदान (₹ लाखात) |
|---|---|---|
| १ | पुणे फिल्म फाऊंडेशन आयोजित पुणे आंतरराष्ट्रीय चित्रपट महोत्सव | ७०.०० |
| २ | दि आशियाई फिल्म फाऊंडेशन आयोजित आशियाई चित्रपट महोत्सव | ३०.०० |
| ३ | मुंबई ॲकेडमी ऑफ मुव्हिंग इमेजेस आयोजित मामि आंतरराष्ट्रीय चित्रपट महोत्सव | २०.०० |
| ४ | मराठवाडा आर्ट, कल्चर अँड फिल्म फाऊंडेशन आयोजित अजिंठा वेरूळ महोत्सव, छत्रपती संभाजीनगर | १०.०० |
| ५ | Aniverse & Visual Arts Foundation, मुंबई आयोजित एनिमेला आंतरराष्ट्रीय AVGC - XR महोत्सव | १०.०० |
| ६ | **"प्रथम येणाऱ्यास प्रथम"** या तत्वावर विहीत निकषांची पूर्तता करणाऱ्या कमाल १० संस्थांना प्रत्येकी अधिकतम ₹ १०.०० लक्ष प्रमाणे | १००.०० |

०२. आंतरराराष्ट्रीय चित्रपट/माहितीपट/लघुपट/ॲनिमेशन महोत्सवाचे आयोजन करणाऱ्या संस्थांना अनुदान देण्याबाबतची योजना दि.०१.०४.२०२४ पासून लागू राहील. सदर योजनेच्या अटी व शर्ती आणि निकष खालीलप्रमाणे आहेत :-

१. सदर योजना ही चित्रपट/माहितीपट/लघुपट महोत्सवाचे आयोजन करणाऱ्या संस्थांना लागू करावी.
२. **सदर योजनेचा लाभ घेण्यासाठी संस्थांनीमहोत्सवाच्या आयोजनापूर्वी प्रस्ताव महाराष्ट्र चित्रपट, रंगभूमी आणि सांस्कृतिक विकास महामंडळाकडे** सादर करणे बंधनकारक करावा.
३. महोत्सवानंतर प्राप्त होणाऱ्या प्रस्तावांना अर्थसहाय्य अनुज्ञेय ठेवू नये.
४. महोत्सवामध्ये जागतिक, राष्ट्रीय व नावाजलेले चित्रपट / माहितीपट / लघुपट यांचा समावेश असावा.
५. स्थानिक व इतर भारतीय चित्रपट / माहितीपट / लघुपट यांचा समावेश असावा.
६. महोत्सवात प्रदर्शित करणाऱ्या चित्रपट / माहितीपट / लघुपट मागील दोन वर्षाच्या आतील (ताजे) असावेत.
७. आयोजन संस्था धर्मादाय आयुक्त कार्यालयाकडे किमान ३ वर्षापूर्वी नोंदणीकृत असावी. **(संस्थेने लिखीत घटना प्रस्तवासोबत सादर करणे बंधनकारक राहील.)**
८. आयोजन संस्था ना नफा ना तोटा या तत्वावर कार्यरत असावी.
९. संस्थेने त्यांच्या किमान ३ वर्षाच्या कार्याचा अहवाल सादर करणे बंधनकारक करावे.
१०. संस्थेने महोत्सवासंदर्भात कार्यशाळा, चर्चासत्र इत्यादी चे स्वतंत्रपणे आयोजन करणे बंधनकारक करावे. **(याबाबत मागील ३ वर्षाचा अहवाल जोडण्यात यावा.)**
११. संस्थेस महोत्सवासंदर्भात छापून आलेल्या जाहीराती, लिखित साहित्य, वृत्तपत्रीय कात्रणे, छायाचित्रे इत्यादी पुरावे सादर करणे बंधनकारक करावे. **(मागील ३ वर्षाचे)**
१२. संस्थेस मागील ३ वर्षाचे सनदी लेखापालाने लेखा विषयक अहवाल सदर करणे बंधनकारक करावे.
१३. चित्रपट / माहितीपट / लघुपटांच्या निवड समितीवर तसेच महोत्सवात प्रदान करण्यात येणाऱ्या पुरस्कार / सन्मान समितीवर शासनाचा किमान एक प्रतिनिधी संस्थेने नेमणे बंधकारक करावे.
१४. चित्रपट / माहितीपट / लघुपट महोत्सवाची जाहीरात, निमंत्रणपत्रिका इ. माध्यमातून **"सांस्कृतिक कार्य विभाग, महाराष्ट्र शासन यांच्या महाराष्ट्र चित्रपट, रंगभूमी आणि सांस्कृतिक विकास महामंडळ यांच्या सहयोगाने"** असा ठळक उल्लेख करणे व लोगो असणे बंधनकारक करावे.
१५. आयोजन संस्थेस महोत्सवाची रूपरेषा (अंदाजित खर्चासहित) सादर करणे बंधनकारक करावी.
१६. महोत्सवाच्या ठिकाणी महाराष्ट्र चित्रपट, रंगभूमी आणि सांस्कृतिक विकास महामंडळाची माहिती देणारी केंद्रे उभारण्यात यावीत.
१७. चित्रपट / माहितीपट / लघुपटाची निवड करताना कोणत्याही प्रकारचा वाद निर्माण होणार नाही व शासनाची प्रतिमा मलीन होणार नाही याची सर्वस्वी जबाबदारी आयोजन संस्थेची असावी.
१८. महोत्सव संपन्न झाल्यानंतर विस्तृत अहवाल महाराष्ट्र चित्रपट, रंगभूमी आणि सांस्कृतिक विकास महामंडळास १ महिन्याच्या आत सादर करणे बंधनकारक करावे.
१९. चित्रपट / माहितीपट / लघुपट महोत्सवांचे प्रस्ताव महाराष्ट्र चित्रपट, रंगभूमी आणि सांस्कृतिक विकास महामंडळ, दादासाहेब फाळके, चित्रनगरी, गोरेगाव (पूर्व.), मुंबई - ६५ यांच्याकडे सादर करणे.

२०. महाराष्ट्र चित्रपट, रंगभूमी आणि सांस्कृतिक विकास महामंडळाने त्यांच्या स्तरावर एक छाननी समिती गठीत करावी. सदर समितीने प्राप्त प्रस्तावांची छाननी करून अर्थसहाय्यासाठी प्रस्ताव शासनास सादर करणे आवश्यक राहील.

२१. चित्रपट / माहितीपट / लघुपट महोत्सवाच्या आयोजनार्थ अर्थसहाय्यबाबत शासनाचा निर्णय अंतिम ठेवावा.

२२. वरील सर्व अटी, शर्ती व निकष शासनाने निश्चित केलेल्या शिखर संस्थांना देखील लागू करावयात.

२३. चित्रपट / माहितीपट / लघुपट महोत्सवाच्या समारोपानंतर किमान ३ महिन्यात उपयोगिता प्रमाणपत्र, जमाखर्चाचा तपशिल (Profit and Loss Account) खर्चाचा ताळेबंद (Balance Sheet) सादर करणे बंधनकारक करावे.

२४. आयोजन करणाऱ्या संस्थांनी खालील बाबींवर कोणत्याही परिस्थितीत खर्च करू नये :-

अ) राहण्यसाठी निवासी सोय

आ) जाहिरात आणि प्रसिध्दी.

इ) कोणतेही व्यावसायिक शुल्क.

ई) संस्थेच्या कर्मचाऱ्यांचे वेतन व भत्ते.

उ) परिक्षण शुल्क.

ऊ) प्रवास भत्ता.

ऋ) कार्यक्रम स्थळाचे शुल्क.

०३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा सांकेतांक क्रमांक २०२४०३१११०३७४०२९२३ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

GOPICHAND PANDURANG CHAVAN

Digitally signed by GOPICHAND PANDURANG CHAVAN
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL DEPARTMENT,
2.5.4.20=2f36b6412b2bad225b8d078a7f80eed5b7d004f917946ac3d5ff416ac9473d48, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=0E195B995C4CFBA1B7E199D1B4B48F8A7C4C1AAD3E82FED8E020632824893159, cn=GOPICHAND PANDURANG CHAVAN
Date: 2024.04.02 14:45:29 +05'30'

**( गो. पां. चव्हाण )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, मलबार हिल, मुंबई
२. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा. उप मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
४. मा. मंत्री, सांस्कृतिक कार्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. मा.विरोधी पक्षनेता, विधानसभा, विधान परिषद, विधानमंडळ, मुंबई
६. मा. विधान मंडळ सदस्य - सर्व.
७. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) एक, महाराष्ट्र, मुंबई.
८. महालेखापाल (लेखा परीक्षा) एक, महाराष्ट्र, मुंबई.
९. महालेखापाल (लेखा परीक्षा) तीन, महाराष्ट्र, मुंबई.

१०. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.ृ
११. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१२. सर्व विभागीय आयुक्त.
१३. सर्व जिल्हाधिकारी.
१४. वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५. नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
१६. महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई.
१७. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र चित्रपट, रंगभूमी आणि सांस्कृतिक विकास महामंडळ, दादासाहेब फाळके चित्रनगरी, गोरेगाव (पूर्व), मुंबई - ४०० ०६५.
१८. व्यवस्थापकीय संचालक, कोल्हापूर चित्रनगरी महामंडळ, कोल्हापूर.
१९. संचालक, सांस्कृतिक कार्य, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२०. पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभागातील सर्व कार्यासने, मंत्रालय, मुंबई
२१. निवड नस्ती, का. सांका.-१.